सन १५-२०१४करिता राज्य योजनेतंर्गत "संशोधन केंद्र आणि प्रायोगिक चाचण्या व क्षेत्रविषयक चाचण्या" (४४१५ ००११) या योजनेचा चालु बाब प्रस्ताव

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एफडीएम-२०१४/प्र.क्र.१६०/फ-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**

तारीखः **३० जानेवारी, २०१५**

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१ /पी /यो /चाबाप्र /प्र.क्र.४७ (१४-१५) /४८५, दि.२५.०६.२०१४.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.१६०/फ-२, दि.१४.०७.२०१४

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. पूरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दि.०१.०१.२०१५

५) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अंदाज-२०१३/ प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२.०१.२०१५

**प्रस्तावना :-**

सन २०१४-१५ करिता "संशोधन केंद्र आणि प्रायोगिक चाचण्या व क्षेत्रविषयक चाचण्या" (४४१५ ००११) या योजनेकरिता एकूण रु.६० ००.लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्याच्या ७० टक्के प्रमाणात रु. ४२.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला होता. त्याअनुषंगाने संदर्भ क्र ३.वरील दि १४.०७.२०१४.रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. १४.७०लक्ष इतका निधी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास,( महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरित करण्यात आलेला आहे. तद्नंतर सदर लेखाशिर्षाअंतर्गत विनाअर्थसंकल्पित असलेला रु. १८.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्याकरिता सन २०१४ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु.१८.०० लक्ष रक्कमेच्या पुरक मागणीच्या प्रस्तावांना विधानमंडळाची मान्यता मिळालेली असून, त्यासंदर्भात वित्त विभागाने संदर्भ क्र.४ अन्वये दि.०१.०१.२०१५ रोजी परिपत्रक निर्गमित केलेले आहे.

सन २०१४-१५ च्या उर्वरीत कालावधीकरिता अर्थसंकल्पित असलेल्या निधीच्या ६० % मर्यादेत निधी वितरीत करण्याच्या सूचना वित्त विभागाने संदर्भ क्र.५ येथील दि.०२.०१.२०१५ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत. त्याअनुषंगाने एकूण अर्थसंकल्पित निधीच्या ६० % मर्यादेत निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील दि.०२.०१.२०१४ रोजीच्या परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पित निधीच्या ६० % मर्यादेत निधी वितरित करण्याबाबत दिलेल्या सूचना विचारात घेता प्रस्तावाअंतर्गत रू.३५.०० लक्ष रक्कमेपैकी रु.१४.७० लक्ष वितरीत केल्यानंतर ६० % मर्यादेत खालीलप्रमाणे **रू.२०.३० लक्ष (०२ मजूरी - रु.१६.०८ लक्ष, २१ पुरवठा व सामग्री - रु.४.२२ लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| उद्दिष्ट | मंजूर नियतव्यय | अर्थसंकल्पित नियतव्यय | पुरवणी मागणी द्वारे अर्थसंकल्पित निधी | सुधारीत अर्थसंकल्पित निधी (३+४) | मान्यता दिलेल्या प्रस्तावाची रक्कम (१०० %) | वितरीत रक्कम | **या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाची रक्कम** |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ०२ मजूरी | २७.०० | १८.९० | ८.१० | २७.०० | २७.०० | १०.९२ | **१६.०८** |
| २१ पु. व सा. | ८.०० | ५.६० | २.४० | ८.०० | ८.०० | ३.७८ | **४.२२** |
| ५३ मोठी बांधकामे | २५.०० | १७.५० | ७.५० | २५.०० | ०.०० | ०.०० | **०.००** |
| **एकूण** | **६०.००** | **४२.००** | **१८.००** | **६०.००** | **३५.००** | **१४.७०** | **२०.३०** |

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. सी-४४१५ प्रधान शिर्ष - कृषि संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनेतंर्गत योजना, ००४ संशोधन, (००)(०१) संशोधन केंद्र आणि प्रायोगिक चाचण्या व क्षेत्रविषयक चाचण्या (राज्य) (४४१५ ००११) या लेखा शिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०१.०१.२०१५ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.-९६/अर्थ-६, दि.२९.०१.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१३०१५३२१२५३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.01.30 15:43:27 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

६) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

७) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

८) जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर / पूणे

९) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

१०) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.